मा.मुख्यमंत्री विशेषकृती कार्यक्रमांतर्गंत यवतमाळ जिल्हातील पूर बाधीत १७ गावांमध्ये पूरसंरक्षक कामांबाबत- मौजे दहिफळ ता.नेर जि.यवतमाळ येथील स्थानिक नालाकाठावर पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पूसंभि-२०१४/(प्र.क्र.२८९/१४)/सिं.व्य.(महसूल)

मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: २१ जुलै, २०१४

**वाचा:-** मुख्य अभियंता जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. २७८७/लपाकक्ष/पु.सं.भि./ २०१४, दिनांक १९/०६/२०१४

**प्रस्तावना:-**

यवतमाळ जिल्ह्यात सन २०१३ च्या पावसाळ्यात अतिवृष्टी झाल्या नंतर मा. मुख्यमंत्री यांचा दौरा झाला. त्या दौऱ्या दरम्यान यवतमाळ जिल्ह्यातील अतिबाधीत १७ गावातील पूरसंरक्षक कामे हाती घेण्याच्या सुचना देण्यात आल्या, त्यामध्ये मौजे दहिफळ येथील स्थानिक नाल्यास दरवर्षी पूर येतो.पावसाळ्यामध्ये नाल्याच्या पूराचे पाणी गावामध्ये शिरते. त्या अनुषंगाने सदर नाल्यावर पूरसंरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देणे बाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयाद्वारे मौजे दहिफळ ता.नेर जि.यवतमाळ येथील स्थानिक नाल्या जवळच्या भागाचे पूरापासून संरक्षण करण्याकरीता पूरसंरक्षक भिंतीचे बांधकाम या कामाप्रित्यर्थ खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे खर्च रु. १७,७१,२४४/- व अनुषंगिक खर्च रु. ७१,३८१/- अशा एकूण रु. १८,४२,६२५ /- (एकुण रुपये अठरा लक्ष बेचाळीस हजार सहाशे पंचवीस फक्त) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास तक्त्याखालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | कामाचे विवरण | अंदाजित किंमत (रु.) |
|---|---|---|
| १ | अ) मातीबांधाची किंमत (४५ मी) | ३,८९,३४३/- |
| | ब) ग्रॅव्हीलॉफ्ट संधानक भिंतीची किंमत (७५ मी.) | १३,८१,९०१/- |
| | **एकूण** | **१७,७१,२४४/-** |
| २ | अनुषंगिक खर्च | ७१,३८१/- |
| | **एकूण खर्च** | **१८,४२,६२५/-** |

अ) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्लू १०९२/(१७०)/सिं.व्य.(कामे), दि.७/०८/१९९२ नुसार कार्यवाही करावी.

ब) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने व दरसुची बाह्य बाबी सक्षम स्तरावर मंजूरी घेवूनच अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

क) संधानकातील बांधकामे त्यांचे संकल्पन व संधानकाची ग्रेड निश्चिती करून कामात आर्थिक बचत साधावी, तसेच सदरहू कामाचे अंदाजपत्रक अद्ययावत दरसुचीनुसार तयार करून कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजीत वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

ड) बांधकामासाठी भूसंपादन करू नये, तसेच नाला प्रवाहाला, पूर संरक्षक मातीबांधामुळे अडथळा निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.पूर संरक्षक बांधाच्या कामानंतर परिसरातील पाण्याचा निचरा पूर परिस्थितीत सुध्दा योग्य पध्दतीने होईल असे नियोजन करून प्रस्तावास तांत्रिक मान्यता दयावी.

इ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूरसंरक्षक कामे मौजे दहिफळ ग्रामपंचायतीने ताब्यात घेवून देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापुर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे दहिफळ ग्रामपंचायती कडून प्राप्त करून घ्यावे.

ई)माती बांधाचे भरावाचे व नाला सरळीकरणाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडून करणे अपेक्षित आहे.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून, कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरित उपलब्ध करुन देण्यात यावे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च ४७११ पुरनियंत्रण प्रकल्पांवरील भांडवली खर्च,(०१) पुरनियंत्रण प्रकल्प,१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका,(०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भागभांडवली अंशदान (४७११ २८८३) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २१ /सन २०१४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

४. प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११७०२०८४०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.07.21 17:00:12 +05'30'

**( य. का. भदाणे )**

**शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,

४. मा.सभापती/उपसभापती, विधान परिषद, विधानभवन, मुंबई

५. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेते,विधान परिषद,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

७. मा.विरोधी पक्षनेते,विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८. मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई,

९. मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई,

१०.मा.राज्यमंत्री,जलसंपदा यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई,

११.प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई

१२.प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१३.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई

१४.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१५.कार्यकारी संचालक,विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर,

१६.मुख्य अभियंता(पा) व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१७.मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,अमरावती,

१८.आंतरवित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई

१९.सर्व सह सचिव/ उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

२०.उपसचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

२१. अधीक्षक अभियंता,यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ,

२२.जिल्हाधिकारी, यवतमाळ,

२३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई

२४. ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई

२५. सिंव्य(महसूल),कार्यासन संग्रहार्थ.